# अर्पण

श्रीसंतांच्या
पदस्पर्शानें पुनीत
झालेल्या प्रिय

## महाराष्ट्रास

# संतावताररहस्य

**उपकारासाठीं केले हे उपाय । येणेंविण काय चाड आम्हां ॥**

" जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती " या एका लहानशा वाक्यात संतांच्या अवताराचें रहस्य आलेलें आहे. ज्या समाजांत हे संत उत्पन्न होतात त्या समाजाचें कल्याण घडवून आणणे हीच त्यांच्या जीवितांची इतिकर्तव्यता असते, असा या वाक्याचा भावार्थ आहे. जगाच्या म्हणजे 'पुढिलाच्या' अथवा 'परकीयाच्या' असा अर्थ येथे इष्ट आहे. महाराष्ट्रीय संतांनीं महाराष्ट्राचें तर ऐहिक व पारमार्थिक कल्याण केलेंच आहे, पण त्या-बरोबरच जगाचेंहि कल्याण सहजच घडून आलें आहे इतकेंच कीं महाराष्ट्राचें कल्याण प्रत्यक्ष झालें असून, जगाचें मात्र पर्यायानें झालेलें आहे. महाराष्ट्रीय संतांनीं जगाचें कल्याण पर्यायानें केलें आहे असें म्हणण्याचें कारण हें आहे कीं, त्यांचें अवतारकार्यक्षेत्र जरी विशेषतः महाराष्ट्रच होतें तरी त्या कार्यांचा परिणाम पर्यायानें सर्व जगभर झालेला आहे. तळ्याचे एका भागांत दगड टाकला असतां त्यांतील पाण्याची खळखळ प्रत्यक्ष जरी त्याच भागांत होते, तरी लहरींच्या रूपानें तें सर्व तळें जसें आंदोलन पावतें किंवा शरीराच्या कोणत्याहि एका भागास सुख अथवा दुःख झालें असतां त्या सुखाच्या अगर दुःखाच्या संवेदना सर्व शरीरभरहि जशा होतात, तसे या विश्वाच्या एका भागाचें सुख अथवा त्याची उन्नति हीं अखिल मानवी सृष्टीचें सुख व उन्नति होत. त्याचप्रमाणें एका दृष्टीनें आमच्या या महाराष्ट्र संतांनीं अप्रत्यक्षतेनें सर्व जगावर उपकार केले आहेत. आज ज्ञात असून प्रचलित असलेल्या सर्व धर्मांस आद्य आणि आमच्या दृष्टीनें व इतरांचेंहि दृष्टीनें तत्त्वज्ञानापुरता तरी सर्वांत श्रेष्ठ, आणि कधीं काळीं अखिल मानव सृष्टीस मिळणाऱ्या शांतिसुखास पोषक असा जो वैदिक धर्म त्याचें उज्जीवन, आणि तेंहि महाराष्ट्रासारख्या देशांत करणारे संत सर्व जगाचें अप्रत्यक्षतेनें कल्याण करणारे होते असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

या वरील विवेचनावरून एक गोष्ट ध्यानात आलीच असेल कीं, संतांनीं जें हें महाराष्ट्राचें कल्याण केलें तें धर्मोज्जीवनानेंच केलें आहे, तेव्हा प्रथम असे प्रश्न सहजच उद्भवतात कीं, धर्माची तेजोहानी झाली होती कीं नाहीं आणि झाली असल्यास ती कशानं ? यापैकीं पहिल्या प्रश्नाचें उत्तर दुसऱ्या प्रश्नाचे उत्तरात अनायासानेंच आलें असल्यानें दुसऱ्याचाच प्रथम विचार करूं म्हणजे झालें.

आमचें ऐहिक व पारमार्थिक कल्याण करण्याची क्षमता म्हणजे तेज स्थिता जी आमचे धर्मांत पूर्वी होती ती मध्यंतरीं नाहींशी होण्यास आमचे दर्शनें बौद्ध मताचा उत्कर्ष, आम्हात रूढ झालेला मिथ्याचार, सामान्य जनतेस दुर्बोध अशा मार्गांत व विचारात स्वधर्ममताचें प्रतिपादन, आमची ऐहिक समृद्धि आणि शेवटीं परधर्मीयाचा प्रवेश ही कारणपरंपरा झालेली आहे. म्हणून या कारणाचा यथानुक्रम थोडक्यात विचार करूं.

बौद्ध दर्शन हें वैदिक धर्मापासून उत्पन्न झालेल्या अनेक दर्शनाप्रमाणच एक दर्शन आहे. त्यात शून्यवाद प्रतिपादलेला आहे. माक्षाऐवजीं या दर्शनात निर्वाण हें ध्येय आहे. निर्वाण हा अभाव आहे, म्हणजे कामक्रोध व लोभ याचा निरास हेंच निर्वाण. निर्वाणाचा बरोबर अर्थ काय आहे तो या दर्शनाचा उत्कर्ष करणारे जे गौतमबुद्ध त्यानींहि कोठें स्पष्ट केलेला नाहीं, परंतु इतकें खरें कीं, मनाची वृत्तिशून्यता हीच निर्वाणस्थिति हें त्यास संमत होतें असें सामान्यतः म्हणण्यास हरकत नाहीं. वर दिलेल्या या दर्शनाच्या ह्या स्थूल स्वरूपावरून एक गोष्ट उघड होत आहे ती ही कीं, मनास वृत्तिशून्यता आणणें हेंच या दर्शनाचें मुख्य ध्येय असल्याकारणानें याचा फार मोठा भर विचारापेक्षा आचाररूपी तपावरच असणं सहज आहे, परंतु इंद्रियाची विषयलोलुपता पूर्णपणें ल्क्षात आणूनच जणू काय जी आश्रम व्यवस्था वैदिक धर्मांत अगर हिंदुधर्मांत विहित केली आहे तिचा अवलंब या बौद्ध दर्शनात न करिता, इंद्रियवृत्तींच्या उपशमनानंतरच इष्ट असा जो संन्यास त्यास प्रथमच विहित गणिल्यानें, आणि चित्तशुद्धि ही स्वभावतः बाह्य चिन्हांनीं प्रत्यक्ष दृश्य होत नसल्यानें, या ( बौद्ध ) दर्शनात स्वतःच्या नाशाचें बीज जणू काय प्रथमच पेरलें गेलें होतें असें म्हणण्यास हरकत

नाहीं. बौद्ध दर्शनासारखीं निरीश्वरवादी आणखीहि इतर दर्शनें नव्हतीं असें नाहीं, परंतु त्या दर्शनाप्रमाणें हें वैदिकधर्मान्तर्गत न रहातां, चातुर्वर्ण्य झुगारून दिल्यानें तो एक स्वतंत्र धर्मच बनला आणि तो तसा स्वतंत्र बनल्यामुळेंच वैदिक धर्मावरहि त्याचा परिणाम होऊं लागला. हे चातुर्वर्ण्याचें उन्मूलन, तत्त्वज्ञानाभावानें अनिश्चित व वृथा आचार, हीं या धर्माचा आर्यावर्तांत अखेर नाश करण्यास जशीं कारण झालीं तशींच प्रथम त्याचा उत्कर्ष होण्यासहि बरींचशीं कारण झालीं आहेत गौतमबुद्धाच्या वेळीं ज्यास वैदिक धर्माची ओळखहि नाहीं अशा चातुर्वर्ण्यबाह्य लोकांचीच आर्यावर्तांत बरीच संख्या असल्यानें त्याच्यातच या धर्माचा विशेष प्रसार झाला होता (बौद्ध मताचा प्रसार नीचवर्णांत अधिक झाला होता असें सर्व तज्ज्ञांचें मत आहे ) तशांत गौतमबुद्धानें आपलें मतांना जो उपदेश केला तो सामान्य जनतेस सहज पटेल अशा शब्दांत व नित्याचे विचारांत केला होता याला प्रत्यंतर पुरावा असा आहे कीं, ज्या देशांत चातुर्वर्ण्यसंस्था प्रचलित नाहीं म्हणजे वैदिक धर्माची ज्या देशांत ओळखहि नाहीं अशाच देशांत या मताचा उत्कर्ष राहिला आहे, आणि उलट त्याचें जन्मस्थान जो हा आर्यावर्त तेथून मात्र त्याचें बहुतेक उच्चाटन झालेलें आहे जे चातुर्वर्ण्य बाह्य होते त्याच्यांत जसा या मताचा प्रसार झाला तसा कदाचित् कांहीं थोड्या वैदिक धर्मानुयायांतहि झाला असणें असंभवनीय नाहीं

या मताचा प्रथम उत्कर्ष होण्यास दुसरेंहि एक कारण असें आहे कीं, गौतम हा राजवंशीय असल्यानें त्याचे जे इतर आप्त होते त्यांचा या मतास सहजच आश्रय मिळाला तसेंच अशोकाच्या व कनिष्काच्या वेळींहि या मतास या सम्राटांनीं जो आश्रय दिला त्याच्या योगानें तर त्याच्या उत्कर्षाची पुढें मामाच झाली, परंतु या मताचा प्रसार होण्यास सर्वांत अत्यंत महत्त्वाचें कारण म्हटलें म्हणजे गौतमबुद्धाचें स्वतःचें अत्यंत शुद्धाचरण हें होय मूळांत कांहीं नसतांहि केवळ एका व्यक्तीच्या शुद्धाचारविचाराच्या उत्कटतेचा समाजावर केवढा मोठा परिणाम घडतो याचें हें प्रत्यक्ष उदाहरण आहे. या बौद्ध मताच्या मुळाशीं विशेष कांहीं नव्हतें, असें म्हणण्यास आधार म्हटला म्हणजे गौतमबुद्धानंतर त्या धर्माची झालेली स्थिति हा होय वर

दर्शविलेले अशोक व कनिष्क याची जोपासना व आश्रय जर या मतास नसती तर आता झाला यापूर्वीच या मताचा आमच्या आर्यावर्तात बहुधा नाश झाला असता. गौतमबुद्ध निर्वाण पावल्यानंतर या दर्शनाची कशी अवस्था झाली हे दर्शविणाऱ्या काहीं आख्यायिका याच दर्शनाच्या धर्म ग्रंथात दिलेल्या आहेत, त्या येथ देतों.

सर्व सुख सोडून इंद्रियांचे दमन करण्यास अनन्य असे जे आचाराचे तप ते सहन करण्यास मुळाशीं आत्यंतिक सुखाची अथवा अशीच काही इतर प्रिय अशी कल्पना सामान्यजनास असणे अवश्य आहे तशी या बौद्ध धर्मात नसल्याने बुद्धाच्या निर्वाणानंतरच आचाराच्या प्रखरतम रूढी, ढळल्या गौतमाचा खुद्द शिष्य सौभद्र "चर झाले, गौतमापासून आम्ही सुटलो, अमुक करा,अमुक करूं नका असा त्याचा आम्हास अत्यंत त्रास असे" असे उद्गार काढता यावरून गौतमाचे हयातीतच त्याच्या शिष्याचे मना वृत्तीची कल्पना सहज होते.

या दर्शनाची सर्व भिस्त आचारावरच होती आणि संन्यासास लाग णारी चित्तशुद्धि नाहीत अदृश्य असल्यामुळे, खरा संन्यस्त कोण व खोटा कोण, हे समजण्यास मार्ग नसल्याने गौतमानंतर या मताचा स्वीकार करणे हे एक उपजीविकेचें सुलभ साधनच झाले होते असे दिसते याचे प्रमाण म्हणून एक आख्यायिका दिलेली आहे, ती अशी —

उपाली म्हणून एक मुलगा होता त्याचे आईबापास एकदा अशी चिंता पडली कीं, त्यास उपजीविकेचे कोणते साधन उपलब्ध करून द्यावे? त्यास लेखक करावे तर त्याची बोटें दुखतात गणित शिकवावे तर त्याचे मन दुर्बळ आहे, सराफी शिकवावी तर त्याचे डोळे खराब होण्याचा समय आहे तब्बद्ध. फार्शीएक दुःख न भोगता उपजीविकेचा अगदीं मोठा मार्ग म्हटला म्हणजे त्यास बौद्धभिक्षु करणे हा होय!

वरील आख्यायिकेवरून या सघात आळशास कसा सहज प्रवेश करिता येत होता हे दिसते आणि म्हणूनच मातापितराची आज्ञा न घेता मुलास सघात प्रवेश करिता येऊ नये असा एक नियम पुढे करावा लागला.

राजा बिंबसार यानें आपल्या राजवटींत अशी एक आज्ञा केली होती कीं, शाक्यपुत्र गौतमाचे दर्शनानुयायी जे कोणी भिक्षु असतील त्यांस राजपुरुषांपासून कोणत्याहि प्रकारचा उपद्रव होऊं नये. या आज्ञेचा फायदा कित्येक चौर्यकर्म करणारांनीं घेतला असा उल्लेख सापडतो. (मृच्छकटिकांतील भिक्षु झालेल्या द्यूतकाराची येथ आठवण होते).

अशोकाच्या वेळींहि गौतमाच्या धर्माज्ञेचें पालन योग्य रीतीनें होत होतें कीं नाहीं हें पहाण्यास, त्यास स्वतन्त्र व गुप्त राज्याधिकाऱ्याची योजना करावी लागली आहे, यावरुन त्या संघाची किंवा धर्माची प्रथमापासूनच कशी स्थिति होत गेली असली पाहिजे याची कल्पना सहज करतां येण्यासारखी आहे. तसेंच गौतमाच्या निर्वाणानंतर वेळोवेळीं भरवाव्या लागणाऱ्या धर्मपरिषदांवरुनहि मताचें अस्थैर्य दृष्टोत्पत्तीस येतें. त्यांतहि मठसंस्था उत्पन्न झाल्याकारणानें दंभाचा दिवसेंदिवस अतिरेक होत चालला होता, असें हेमचंद्रसूरींच्या कुमारपालचरितावरुन स्पष्ट होतें.

या वरील विवेचनावरुन हें सहजच लक्षांत येतें कीं, बौद्ध धर्मांत मिथ्याचाराचा म्हणजे दंभाचा अत्यन्त प्रसार झाला होता. जेथें दंभ उत्पन्न होतो तेथ बाह्य शोभा आणि बाह्य आचार इकडेच प्रवृत्ति अधिक असते; प्रतिस्पर्धीमताचा असा उत्कर्ष झाल्यामुळें वैदिक अथवा हिंदु धर्म याचें अस्तित्वाबद्दल (राजाश्रय नसल्यानें) संशय उत्पन्न होणें साहजिक होतें. तत्वज्ञान कितीहि अप्रतिम असलें तरी, कोणत्याहि धर्माची स्थिति ही विशेषत: सामान्य समाजावर अवलंबून असल्यामुळें व सामान्य समाजाची प्रवृत्ति तत्वज्ञानापेक्षां आचाराकडेच जास्त असल्याकारणानें, बौद्ध धर्माच्या सरणीनें वैदिक अथवा हिंदु धर्मांतहि आचाराचें प्राबल्य होऊं लागलें असल्यास नवल नाहीं. मन्त्रतंत्र व अभिचार इत्यादि आचाराचीं बीज तर अथर्ववेदापासूनच होतीं, परंतु या बौद्ध धर्माच्या उत्कर्षकाळीं व अपकर्षकाळींहि केवळ अहमहमिकेनें व स्वतःच्या स्थिरतेकरितां म्हणून तरी या मन्त्रतन्त्रअभिचाराचा हिंदु धर्मांत विस्तृत प्रमाणावर प्रचार होऊं लागणें असंभवनीय नव्हतें.

गौतमबुद्धाच्या उत्कर्षाचे वेळीं किंवा किंचित् त्यामागून हिंदु धर्मांत

उपासनाप्रधान म्हणजे आचारप्रधान वैष्णव व शैव पंथांची प्राणप्रतिष्ठा झाली; व तेथपासून आचारप्रवणतेस भर येत चालला. तशांत तत्त्वज्ञानाचें विवेचन संस्कृत ग्रंथांत केलें असल्याकारणानें व समाजांतील फारच थोड्या मागास संस्कृत अवगत असल्यानें बहुजनसमाज आचारशीलच बनणें सहज होतें; तत्त्वज्ञान समजण्यास स्वतःचे बौद्धिक परिश्रम लागतात; तसें आचारांचें नाहीं. आचारांस नुसतें अनुकरणहि पुरतें आणि म्हणून उपासनेचे ग्रंथ किंवा आचार घालून देणारे ग्रंथ, संस्कृतग्रथित असले तरी त्यांचा बोध स्वतःस होण्याची अवश्यकता नसल्याकारणानें संस्कृताचें अज्ञान आचारप्रवृत्तीच्या आड येणें शक्य नव्हतें.

वर दिलेल्या वैष्णव व शैव संप्रदायांचे पुढें झालेले भिन्न भिन्न संप्रदाय लक्षांत घेतले म्हणजे आचाराचा एकंदर जनतेवर केवढा परिणाम झाला होता याची सहज कल्पना होते.

धर्मकल्पनेची इकडे ही अशी स्थिति असतां तत्कालिन राजकीय व सांपत्तिक स्थितिहि तीस परिपोषक अशीच झालेली होती. शकासारखे परकीय व कदाचित् परधर्मीय राजे इकडे येऊन जरी त्यांनीं येथे राज्यें स्थापिलीं तरी बौद्ध, जैन अथवा हिंदु धर्म यांपैकीं कोणत्या तरी एका धर्माचा त्यांनीं स्वीकार केलेला असल्यानें, आपापल्या मनोवृत्तीनुरूप या तिघांपैकीं कोणत्याना कोणत्या तरी एका धर्मास राजाश्रय मिळून त्याची भरभराट होत असे; या राजांचे राजवटींत तदितर धर्मांचा छल जरी क्वचितच झालेला आहे, तरी भिन्न धर्मांचा जनतेवर व परस्परावर परिणाम होण्याचें चुकलें नसेल. पांचवे सहावे शतकाचें सुमारास संस्कृताचें व त्याबरोबरच हिंदु धर्माचें (म्हणजे वस्तुतः तत्त्वज्ञानाचें) पुनरुज्जीवन झालें. त्या कालानंतर झालेल्या राजांपैकीं कित्येकांनीं स्वतःस " महाभागवत " अस उपपद धारण करण्यांत भूषण मानलेलें आहे. ' भागवतधर्म ' म्हणजे उपासनासंप्रदाय, यात द्वैत प्रतिपादन केलें असल्यानें उपासनेवरच मोठी भिस्त असते; यावरून एक गोष्ट लक्षांत येते ती ही कीं, हिंदु धर्माच्या पुनरुज्जीवनाच्या वेळीं सुद्धां आचाराचेंच प्राबल्य होतें. स्वराज्य असल्याकारणानें स्वास्थ्य व संपत्ति यांचा त्या वेळींच अतिरेक

झालेला होता अशी इतिहास साक्ष देत आहे. जेथें संपत्ति व स्वास्थ्य यांचा अतिरेक होतो व उच्चतर ध्येय पुढें नसतें, तेथें मनाच्या दुर्बलतेस सहजच प्रारंभ होतो; आणि एकदां मनास दुर्बलता आली म्हणजे वैय्यक्तिक व राष्ट्रीय दुर्गुणांचें ते माहेरघरच बनतें. अशा वेळीं या दुर्बल झालेल्या राष्ट्रीय मनास लपण्यास आणखी एक साधन त्या वेळीं मिळालें तें असें. मोक्षास साधन ज्ञान हें आहे आणि ज्ञान्यास स्वकर्म नाहीं, असलें सर्वोत्कृष्ट व उच्चतम प्रमेय दांभिकास आणि आळशास लपण्यास फार सोईचें होतें. आमचे समाजांत आचारप्राचुर्य आधींच झालेलें होतें; व संपत्ति, अधिकार आणि स्वास्थ्य यांचे योगानें मनाचा कणखरपणा जाऊन तपाचा लोपहि आधीं झालेला होता. तेव्हा बाह्य चिन्हांनीं ओळखण्यास अशक्य असें जें ज्ञान त्याचें सोंग घेऊन, कर्माचें कष्टाचरण ज्ञानी म्हणून सोडून देणें दांभिकांस व आळशांस फारच सुकर झालें; आणि अशा तऱ्हेनें ज्ञानी आणि अज्ञानी यांच्यात भेद न राहिल्याने "स्वधर्म" अथवा "स्वकर्म" याची ओळख आमच्या समाजांतून पार बुजून गेली.

> आधींच आळशी । वरि गुरूचा उपदेशी ॥
> मग त्या कैंचि आडकाठी । विधिनिषेधाची भेटी ॥
> नाचरवे धर्म । न करवे विधिकर्म ॥
> तुका म्हणे ते गाढव । मनासवें घेती धांव ॥ १×१२५

स्वकर्माचा कंटाळा आपल्या या समाजांत किती आला होता याचें आणखीहि दर्शक म्हणजे अकराव्या शतकाच्या सुमारास आणि तदनंतर शैवरत्न वीरशैव म्हणजे लिंगाईत व महानुभाव म्हणजे मानभाव यांचा इकडे झालेला उद्भव होय. चातुर्वर्ण्यास कंटाळलेले, स्वकर्म करण्याची अंगीं धमक नसलेले, आणि ब्राह्मणादि उच्च वर्णांचा द्वेष मनांत बाळगणारे अशा पुरुषांनीं या दोन मतांची स्थापना केलेली आहे. बौद्ध मताच्या उत्पत्तीच्या कारणांत व या वर दिलेल्या दोन मताच्या उत्पत्तीच्या कारणात बरेंच साम्य आहे.

तसेच संन्यास हा आश्रमानुरूप न घेतां बौद्ध मताप्रमाणेच यातहि आरंभींच विहित केलेला आहे. इतकेंच कीं, मानभाव या आश्रमास स्पष्ट संन्यास म्हणतात, त्यासच लिंगाईत दीक्षा असें म्हणतात; परंतु या दोन मतांचा जो इतिहास आहे त्यांत एक गोष्ट विशेष लक्षात ठेवण्यासारखी आहे. ती ही कीं, लिंगाइतांचा धर्मपोषक जो बसव, तो जितका दुर्वृत्त होता तितकाच अथवा त्याहूनहि अधिक गौतम हा सच्छील आणि सदाचारी होता. तसेंच मानभावपथांतील कांहीं आचार जितके दुराचाराचे भासतात, तितकेच बौद्ध मतांतील आचार त्या धर्माचे प्रसाराचे प्रारंभीं सदाचाराचे कोटींत जाणारे होते. असें असूनहि या दोन्ही मतांचा या महाराष्ट्रांत इतका प्रसार झाला ही एकच गोष्ट त्या महाराष्ट्राचे झालेलें धार्मिकदृष्ट्या पतन व त्याच्या मनाची दुर्बलता दाखविण्यास पुरेशी आहे. यापेक्षा या बाबतींत जास्त लिहून मनास उदासीनता आणणें इष्ट नाहीं म्हणून येथेंच थांबतो.

बौद्ध मताच्या प्रसारानंतर हिंदु धर्मास जरी ग्लानि आली होती तरी ११ वे शतकापावेतों तिचा कायमचा फायदा घेणारा धर्मशत्रु कोणी उत्पन्न झाला नव्हता. परंतु दुर्दैवानें अथवा सुदैवानें म्हणा तो ११ वे शतकांत म्हणजे संतांचे अवतार होण्यापूर्वी सुमारें एक शतक आर्यावर्तांत उत्पन्न झाला. हें परधर्माचें संकट आमचा धर्म व आमचा समाज यांचेवर सारखेंच आलेलें होतें. याचे योगानें नर्मदाउत्तरतीरीं जो धर्माचा उच्छेद झाला होता, त्याची अभ्रे आमच्या या महाराष्ट्रावर पडतात न पडतात तोंच संतांचा अवतार झाला.

शक ११०० ते शक १७४० पावेतों जवळजवळ ७०० महाराष्ट्रीय संत-कवि झाले आहेत, आणि या सर्वांना धर्मोज्जीवनाचें कार्य उपदेशरूपी काव्यांनीं केलें आहे. 'कवि' शब्दाची व्याख्या आमच्या संतांनीं केलेली आहे—

> वेदशास्त्रांचा मथितार्थ । जाला करतळामळकवत् ॥
> तैसा च ब्रह्मानंदें डुलत । कवि निश्चित या नांव ॥ ११×१०५०
> कवि वैराग्याचें संरक्षण । कवि भक्तांचें भूषण ॥
> नाना स्वधर्मरक्षण । तें हे कवि ॥ १×७×१२ ॥

तिचा विचार केला व कवित्वाची—

**जेणें ज्ञान हें प्रबळे । जेणें वृत्ति हे मावळे ॥**
**जेणें भक्तिमार्ग फळे । या नांव कवित्व ॥ १४×३९.**

ही जी व्याख्या दिली आहे, तिचा विचार केला म्हणजे यास 'कवि' आणि त्यांच्या कृतीस 'काव्य' म्हणण्यास हरकत नाहीं यांच्या

काव्याचें स्वरूप

असें आहे कीं, स्वतःचें ऐहिक कल्याण चित्तांत बाळगून त्यांनीं आपल्या बुद्धीचा व्यय काव्यात कधींच केलेला नाहीं कविता ही उपजीविकेचें साधन आहे अथवा लोकैषणेची एक पायरी आहे असला ग्राम्य विचार यांचे मनास कधींच शिवला नाहीं. केव्हां केव्हां स्वतःच्या निर्गुणउपासनेच्या गाढ प्रेमात रंगून जाऊन, तर केव्हां सगुणचरित्राच्या वर्णनांत दंग होऊन सहजस्फूर्तीनें त्यांच्या मुखावाटे जे उद्गार निघाले ते हें काव्य होय. क्वचित् प्रसंगीं वृत्तीवर येऊन आत्मिक कल्याणापासून दूरतर जाणारी ही जनता पाहून कळवळलेल्या मृदु अंतःकरणानें तीस केलेला उपदेश ही त्या विश्वात्मक प्रभूची त्यांनीं केलेली सेवा होय उपास्य देवतेची अथवा विश्वात्मक प्रभूची सेवा हा एकच विषय संताचे मनास व बुद्धीस असल्या कारणानें त्यांचें सर्व काव्य एकाच स्वरूपाचें झालेलें आहे हा दोष नव्हे, गुण आहे. जेथें मनोरंजन हा हेतुच नाहीं तेथें विविधतेची आवश्यकता भासत नाहीं. श्रीज्ञानेश्वर, एकनाथ, समर्थ, मुक्तेश्वर, वामन अथवा मोरोपंत यांच्यासारखे प्रतिभासंपन्न कवि क्वचितच आढळतात शब्दचमत्कृति आणि ध्वनि अथवा भाषा आणि रस हा त्यांचेपुढें हात जोडून तयार असतात असें त्यांच्या ग्रंथावरून स्पष्ट होत आहे. असें असूनहि त्यांनीं आपल्या मनाचे कोड व बुद्धीचे विलास परमात्म्याचे सगुणनिर्गुण गुण गाण्यांतच पुरविले याचें कारण, त्यांच्या कवितादास्तीस दुसरे विषय नव्हते असें नव्हे, तर त्यांचे मनास व बुद्धीस दुसरा विषय नव्हता

**ऐसा भगवंतीं रंगला । आणीक कांहीं न लगे त्याला ।**
**स्वइच्छा वर्णु लागला । ध्यान कीर्ति प्रताप ॥** दास १४×३

पार काय सांगाव! परंतु रसकल्लोळ, शृंगारतरंगिणी, कामिनीमन यांचे मत अनुक्रमें शिवराम, वेणागाम व रम्भी या प्रथकारांनी आपापलीं काव्यें लिहिण्याचा आरंभ जा उद्देश दिला आहे तो असा कीं, हीं काव्यें वाचून विषय बारत कितीहि गाढ बाग्ला तरी तो आत्यंतिक सुख देणारा नाहीं असे मनांत पटून वैराग्याची उत्पत्ति व्हावा सारांश, मणि भिन्न असले तरी जसे एकच सूत्र त्यांतून ओंवलेलें असतें तसे शब्द व विचार आणि क्वचित् प्रसंगीं विषयहि भिन्न असले तरी " पुढीलाच सुख-उत्पत्ति " प्रीत्यर्थ विश्वात्मक प्रभूची सेवा हा एकच विषय या संताचे बुद्धीत होता

परोपकाराकारणें । कवित्व अगत्य करणें ॥ दास १४×३

यांचे काव्यग्रंथाचा साकल्यानें विचार केला तर असें दिसून येईल कीं, एका विशिष्ट कालापर्यंत तरी ज्ञान व उपासना म्हणजे विचार व विकार यांच आव सारखा वहात होते आणि त्या विशिष्ट कालानंतर म्हणजे इष्ट स्थिति प्राप्त झाल्यानंतर बुद्धीस मागें सारून मन हें पुढें सरसावलें, म्हणजे ज्ञानापेक्षा उपासना या ग्रंथात जास्त दृग्गोचर होऊं लागली हें जें वैचित्र्य दिसून येतें तें अहेतुक खास नव्हते कारण, कोणत्याहि एका समाजाच्या विशिष्ट कालीं ज्या उत्कट आकांक्षा असतात त्यांचे त्या त्या कालीं उत्पन्न होणाऱ्या वाङ्मयांत प्रतिबिंब पडलेच पाहिजे असा नियम आहे, आणि या नियमास अनुसरूनच ज्ञानाचे अमुख्य तत्त्व जें नैष्कर्म्य त्यानें श्रीज्ञानेश्वरापासून तों समर्थांपर्यंत प्रतिपादन केलेलें आहे कारण, हें नैष्कर्म्य स्वधर्माची आळस बुनालेल्या महाराष्ट्रास त्या वेळीं अत्यंत अवश्यक होते तसेंच श्रीपुंडलिकापासून अथवा नामदेवापासून तों तुकारामापर्यंत आचारदृष्टीनें पतित झालेल्या महाराष्ट्राच्या दंभमत्सरादि मनोविकारावर आघात केलेले आहेत या

## दोन ओघाचे

चालकांपैकीं एकाच श्रीज्ञानेश्वरमहाराज हे विशेषत निर्गुणोपासक शैव, व दुसऱ्याचे नामदेव हे सगुणोपासक वैष्णव होत एकनाथांनीं या दोन

सगुणनिर्गुणांचें एकीकरण करून उपासना व ज्ञान यांचा समतोलपणा कायम ठेविला; आणि याचा उत्कर्ष श्रीसमर्थांनीं केला. अशा रीतीनें ज्या इष्टसिद्धीकरितां नैष्कर्म्य अवश्यक होतें त्याचें प्रतिपादन येथें संपलें. श्रीसमर्थांनंतर जे ग्रंथ झाले त्यांतील बहुतेकांचा भर सगुणोपासनेवर होता.

वरील विवेचन करीत असतां शैव व वैष्णव संप्रदायाचा आम्हीं सहज उल्लेख केलेला आहे. या संप्रदायाचें विवेचन अप्रासंगिक नसल्यानें थोडक्यांत करणें इष्ट आहे. तें करण्यापूर्वी प्रथमच एक गोष्ट सांगून ठेवणें जरूर आहे कीं, उत्तरेकडे अथवा दक्षिणेकडे या शैववैष्णव मतांत जितका भेद स्पष्ट दिसतो तितका तो आमच्या महाराष्ट्रांतील संतमंडळींत दृग्गोचर होत नाहीं. तसेंच शैवांच्या कापालिक अथवा कालमुख आणि वैष्णवांच्या वल्लभी अथवा राधाकृष्ण पंथाप्रमाणें बिभत्स व अश्लील मताचाहि प्रवेश झालेला नाहीं.

## महाराष्ट्रीय वैष्णवसंत

हे केवळ सगुणोपासकच नसून त्यांची बुद्धि सगुणाचे पलीकडे निर्गुणापर्यंत गेलेली होती. रामानुजाच्या चतुर्व्यूहाचा नामनिर्देश क्वचित् एखाद्या अभंगांत आलेला असला तरी तो अपवादात्मक गणला जावा अशा स्वरूपाचा आहे. वल्लभाच्या मताचा अति शुद्ध असा रुक्मिणीपांडुरगसंबंधरूपी (राधाकृष्ण नव्हे) परिणाम कांहीं विराण्यांच्या अभंगामध्यें दृग्गोचर होतो. यांखेरीज केवळ सगुणप्रेमावाचून वैष्णव मताची दुसरी खूण इकडे दिसत नाहीं. शैव मताचेंहि तसेंच आहे; परंतु या मतासंबंधानें थोडासा विस्तारपूर्वक विचार करूं.

आज उपलब्ध असलेल्या ग्रंथावरून नैष्कर्म्याचें प्रतिपादन श्रीसमर्थापावेतों सर्व संतमंडळींनीं जें कमीअधिक प्रमाणांत केलेलें आहे त्या ज्ञानाच्या उगमाचा अनुमान परिणामाच्या दृष्टीनें श्रीज्ञानेश्वरमहाराजांकडे येतो. श्रीज्ञानेश्वर हे नाथपंथी होते, असें त्यांच्या परंपरेवरून स्पष्ट दिसत आहे.

> आम्हीं एक दीन । जाणा नाथपंथी ।
> नीचाहूनी आथी । अति नीच ॥

असें त्यांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे. हा नाथपंथ म्हणजे ज्याची परंपरा

आदिनाथापासून सुरू झाली आहे, तो शैव होता का वैष्णव होता याचा थोडक्यात निर्णय करणें जरूर आहे.

*आनंदराचार्यांच्या परंपरेंतील वासुदेव नांवाच्या एका कवीचा* 'उपदेश सार' म्हणून अष्टप्रकरणात्मक एक ग्रंथ उपलब्ध झाला आहे त्याचे शेवटीं आपल्या स्वतःच्या नाथपंथास उद्देशून तो असें लिहितो —

> ये लोकरूढीस्तव शिष्यजन । हा नाथसंप्रदाय म्हणोन ।
> गुरुनामीं नामाभिधान । आवडीनें योजितीं ॥
> परि हा भागवतसंप्रदाय । परंपरा श्रीनारायण ॥

वासुदेवाचा नाथसंप्रदाय असूनहि त्यास ते भागवत संप्रदाय म्हणतात असें येथें स्पष्ट होत आहे. एवढ्यावरून कदाचित् कोणास अशी शंका येईल कीं, भागवत संप्रदाय म्हणजे वैष्णवसंप्रदाय आणि म्हणून नाथसंप्रदाय हा वैष्णवसंप्रदाय आहे, परंतु ही चूक आहे. भागवतसंप्रदाय जसा वैष्णव होता तसाच शैवहि होता. वैष्णवभागवत व शैवभागवत (स्मार्त) असें म्हणण्याचा प्रघात असे. या संप्रदायास 'भागवत' हे उपपद लावण्याचें मुख्य कारण असें कीं, ते दोन्ही द्वैतप्रतिपादक असून उपासनात्मक होते. म्हणजे 'भागवत' हा शब्द उपासनादर्शक आहे. यावरून केवळ 'भागवत' या शब्दानें निर्दिष्ट संप्रदाय, शैव किंवा वैष्णव आहे याचा खुलासा होत नाहीं. श्रीशंकराचार्यांच्या संप्रदायास जरी नाथसंप्रदाय म्हटलें आहे तरी त्याची परंपरा आदिनारायणापासून असल्याकारणानें त्यास 'वैष्णवभागवत' म्हणता येईल. श्रीज्ञानेश्वरांच्या संप्रदायाचें तसें नाहीं. हा नाथसंप्रदाय आदिनाथापासून परंपरागत आल्यानें हा शैवच आहे. असें निश्चित होतें. दुसरें असें कीं या परंपरेतील श्रीगोरक्षनाथ अथवा श्रीनिवृत्तिनाथ यांच्या स्वरूपाचें म्हणजे संप्रदायचिन्हांचें जें वर्णन उपलब्ध आहे तसें वर्णन वैष्णवसंप्रदायांत असलेलें उपलब्ध होत नाहीं इतकेंच नाहीं, परंतु नाथसंप्रदायांतील व्याघ्रांबर, भस्मोद्धूलन, कौपीन, सेली, शिंगी, मुद्रा, कंथा, झोळी आणि त्रिशूळ हीं चिन्हें वैष्णवसंप्रदायांत असणें अशक्य आहे. परंतु कदाचित् कोणी अशी शंका काढील कीं शैव व वैष्णव हे दोन्ही संप्रदाय द्वैतप्रतिपादक असून

उपासनाप्रधान आहेत असें वर आलेलें आहे. आणि श्रीज्ञानेश्वर तर अद्वैतवादी होते, मग ते शैव कसे?

या प्रश्नाचे उत्तर हा एक मोठाच पुरावा श्रीज्ञानेश्वर हे शैव होते हे प्रस्थापित करणारा आहे. कसे ते पहा. श्रीज्ञानेश्वरांनी आपल्या "श्रीअनुभवामृत" नामक स्वतंत्र ग्रंथांत ज्ञान, अज्ञान व जीवनमुक्ति यांचे खण्डन केलें आहे. अज्ञानाचे खण्डन केलें असल्याकारणाने मायेचें खण्डन सहजच झालें म्हणजे श्रीशंकराचार्यांचा विवर्त अथवा माया वाद श्रीज्ञानेश्वरांस संमत नाही हें उघड होत आहे. तसेंच सहजावस्था हीच जीवन्मुक्ति असें त्यांनी प्रतिपादन केलें असल्याकारणाने ते पूर्ण अद्वैती आहेत.

> जाली स्वइच्छाचि विधि । स्वैर झाला समाधी ।
> दृशे ये मोक्षसिद्धी । बैसों धापे ॥ ९×३४
>
> जाला देवोचि भकु । ठावोचि जाला पंथु ।
> होउनि ठेला एकांतु । विश्व चि हें ॥ ९×३५
>
> ना स्मरे दिसे शिवु हि । परि देखिलें कांहीं नाहीं ।
> देवभक्तां दोहीं । एकोच पाडु ॥ ९×५६

तव्हां श्रीज्ञानेश्वर पूर्ण अद्वैतवादी असून, उपादानावाचून जगाची उत्पत्ति झाली असे त्याचे मत होतें, तसेंच मायाभ्रम अथवा विवर्तवाद (उपादान नसल्याने) त्यास संमत नव्हता इतकें स्पष्ट होत आहे.

अगदीं हेच मत शैव संप्रदायात शक ७०० चे सुमारास काश्मीरात प्रतिपादन केलें गेलें आहे. वसुगुप्त व त्याचे शिष्य कल्लट आणि सोमानन्द व त्याचे शिष्य उदयाकर यांनी काश्मीरात अद्वैत शैवमताचा प्रसार केला आहे. या अद्वैत संप्रदायाचे मत श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या मताशीं अत्यंत अभिन्न आहे असें वसुगुप्ताच्या खालीं दिलेल्या अनुष्टुपावरून स्पष्ट होईल.

> निरुपादानसंभारमभित्तावेव तन्वते ।
> जगच्चित्रं नमस्तस्मै कलाश्लाघ्याय शूलिने ॥

"भिंतीवाचून जसें चित्र निर्माण करावें तसें उपादानावाचून जगत्

निर्माण करणाऱ्या शूलधारी शंभूस नमन असो.'' असा या अनुष्टुपाचा अर्थ आहे. या एका श्लोकांत श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या सर्व मतांचें सार आलेलें आहे. तेव्हा या मतैक्यावरून तर श्रीज्ञानेश्वर हे अद्वैत शैवसंप्रदायी होते याबद्दल मुळींच संशय रहात नाहीं.

यावरून एक विचार सुचतो तो येथें नमूद करावासा वाटतो. श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे गुरुपरंपरेंतील श्रीआदिनाथ सोडून दिले तर मत्स्येंद्र, गोरक्ष हे उत्तर हिंदुस्थानांतील होते अशी आख्यायिका आहे. तरी वर दिलेल वसुगुप्त व सोमानंद यांचे संप्रदायाचा काश्मीरांत विशेष शोध केल्यास आमच्या महाराष्ट्रीय नाथपंथाचा थोडा अधिक सुगावा लागण्याचा संभव आहे, असो.*

मागें सांगितल्याप्रमाणें उत्तरेकडे परधर्मीयांची जी वावटळ आली तिचा परिणाम काय झाला हें महाराष्ट्रीय संतांनीं प्रत्यक्ष पाहिलें असलें पाहिजे यांत संशय नाहीं. धर्माचे नांवाखालीं परकीयांनीं वैदिक अथवा हिंदु धर्माचा उच्छेद केला, 'तीर्थ क्षेत्रें भंगिलीं,' दैवतांचा अपमान झाला, आणि असल्या या भयंकर संकटास तोंड देण्याची सामान्य जनतेची तयारी पाहिली तर ती मनाच्या दुर्बलतेनें आजहीन व तपहीन झालेली, तिचे आश्रमधर्म सुटलेले, व केवळ आचारप्रवण आणि म्हणून परस्परमत्सरग्रस्त अशी, थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे ती जनता आपल्या स्वकर्मास अथवा स्वधर्मास पराङ्मुख झालेली अशी आढळून आली असली पाहिजे. धर्माची व देशाची अशी दीन स्थिति पाहून श्रीसंतांनीं धर्माचें उज्जीवन करण्याचे हेतूनें जनतेच्या वैयक्तिक व राष्ट्रीय गुणांस अवश्यक ज तेज व तप त उत्पन्न

करण्याचा उपक्रम केला. या तेजास व तपास नैष्कर्म्यावांचून दुसरा आधार नाहीं. नैष्कर्म्याचा उपदेश करण्याचा आद्य मान परमेश्वरकृपेनें नाथपंथी श्रीज्ञानेश्वर किंवा श्रीमुकुंद यांजकडेस आला. ज्ञानकर्माचा समुच्चय कसा होतो, जाणीवभक्ति कोणती, संन्यास म्हणजे काय, थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे ज्ञान्याचें कर्म काय याचा उपदेश श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं केला. आणि वर सांगितल्याप्रमाणें त्याच तत्त्वाचा अनुवाद श्रीसमर्थापर्यंत इतर निर्गुणोपासकांनीं केलेला आहे. हेंच महत्कार्य श्रीतुकारामांपावेतो सुगम होण्यास सगुणोपासकांनीहि हातभार लावलेला आहे; कसा तें मराठी वाचकांस स्पष्ट करून सांगण्याची अवश्यकता नाहीं.

या तेजस्वी नैष्कर्म्यतत्त्वाच्या शिकवणीचा पुढें लवकरच काय परिणाम झाला त्याची साक्ष वर्णाश्रमांतील आजचें आमचें अस्तित्वच देत आहे, असो.

वरील विवेचनावरून नैष्कर्म्याची शिकवण हीं संतांच्या अवताराचें रहस्य आहे असें सुज्ञ वाचकांच्या लक्षांत आलें असेलच. पुढील सर्व संतांनीं आद्य ग्रंथ जो श्रीज्ञानेश्वरी त्याचा आश्रय करूनच नैष्कर्म्याचें प्रतिपादन केलं असल्याकारणानें श्रीज्ञानेश्वरीचें त्या दृष्टीनें अवलोकन केलें म्हणजे इतर संतांच्या सर्व ग्रंथांचें अवलोकन केल्यासारखें होईल, ही भावना ठेवून आतां श्रीज्ञानेश्वरीकडे वळतो.



# श्रीज्ञानेश्वरीरहस्य



तत्र को मोहः कः शोक एकत्वमनुपश्यत ॥ ईश उ ७
देखे प्रामार्थ जाले । जे निष्कामता पातले ॥
तैयां हि कर्तृत्व असें उरलें । लोकालागीं ॥ ज्ञाना ३×२९

एकत्व पहाणाराचे ठिकाणीं शोक, मोह असेल तर तो जावा; नसलाच तर जावयाचा काय ? असो.

तेव्हा एकच वस्तु अखंडत्वानें स्फुरण पावणें म्हणजेच जर मोहनाश आहे. तर विविधत्व अथवा द्वंद्व भासणें हा मोह आहे किंवा हें मोहाचें कार्य आहे हें उघड आहे. जेथें द्वंद्व आहे म्हणजे जेथें दोनपणा आहे तेथें सुखदुःख आहे. परंतु हें द्वंद्व स्वतः असत्य व विनाशी असल्यानें हें सुखदुःखहि विनाशी आहे व म्हणून तेथें शोकाची उत्पत्ति आहे. मोहाबरोबर द्वंद्व, द्वंद्वानें सुखदुःख व त्यामुळें शोक. तेव्हा मोह व शोक यांची जोडी अबाधित आहे. एकाचा नाश तोच दुसऱ्याचा नाश, एकाची उत्पत्ति तीच दुसऱ्याची.

आता 'ब्रह्म होणें' म्हटलें म्हणजे तेथें पूर्वी 'नसणें' किंवा 'असून' हि कांही कारणानें 'नाहीं' अशी समजूत असणें या दोहोंपैकीं कोणती तरी एक स्थिति पाहिजे. यापैकीं कोणतीहि सत्य असले तरी तेथें 'उद्यम' हा हवाच.

**तैसा आत्मबोधीं उद्यमु । करितां होये जो श्रमु ॥ १८×१०८८**

आणि दुसराच पक्ष खरा असल्यानें या उद्यमात व मोहात नेहमीं भांडण असावयाचें. या उद्यमास 'स्वकर्माचरण' म्हणता येईल.

कोणतेहि स्वकर्म अथवा प्राप्तकर्म करण्यास उद्युक्त झालेला अथवा होणारा मनुष्य त्या कार्यापासून अथवा प्रवृत्तीपासून पराङ्मुख होण्यास, त्यास मोह हें एकच मोठें बलवत्तर कारण होतें. याचा पर्यायशब्द श्रीज्ञानेश्वरींत संशय म्हणून दिलेला आहे. जो मोह तोच संशय. हा मोह अज्ञानापासून होतो व तो विश्वासाचा नाश करतो.

**जें अज्ञानाचें गडदें पडे । तें हा बहुवसु मनीं वाढे ।**
**म्हणौनि सर्वथा मार्गु मोडे । विश्वासाचा ॥ ४×२०३**

असला हा मोह अथवा भ्रम ज्या वेळीं मनात प्रथम उद्भवेल त्याच वेळीं सदसद्विवेकानें त्याचा जर नायनाट केला नाहीं, तर तो मनुष्याची बुद्धि व्यापून टाकतो, म्हणजे या मोहग्रस्त मनुष्याचा बुद्धिभेद होतो आणि

एकदा बुद्धिभेद झाला, म्हणजे त्यामागून नाश हा ठेवलेलाच असतो

**हृदईं हा चि न समाए । आणि बुद्धितें गवसूनि ठाए ।**
**तेथ संशयात्मक होए । लोकत्रय ॥ ४×२०४**
**मग संशई जरि पडिला । तरि निभ्रांत जाणें नाशला ।**
**तो अहिकाही परि मूकला । सुखासि गा ॥ ४×१९७**

असल्या संशयी मनुष्यास परमार्थ तर साधत नाहींच परंतु त्याचे ऐहिक सुखहि नाश पावते अंतर्यामी प्रखर वैर ठेवणारा मित्र जसा अत्यंत भयंकर असतो, तसा हा विवेकाचें कातडे पांघरणारा मोहहि अत्यंत घातक असतो उघड शत्रूपेक्षा हितशत्रु जास्त भयंकर कारण, तेथें विश्वास उत्पन्न होतो व त्यामुळे प्रतिकाराची योजना होत नाहीं असल्या या मोहामुळे हित ते अहित व अहित ते हित वाटूं लागते जें कर्म इंद्रियास प्रिय तेंच बुद्धीसहि कल्याणकारक भासूं लागते

कर्म हें तात्कालिक सुख उत्पन्न करणारें म्हणजे प्रेय आणि आत्यंतिक सुख उत्पन्न करणारें म्हणजे श्रेय असें दोन प्रकारचें आहे पहिल्या प्रकारचें कर्म मनादि इंद्रियास व दुसऱ्या प्रकारचें कर्म सुबुद्धीस* प्रिय असते तेव्हां जें सुबुद्धीस पटतें तेंच मनासहि आवडणें हेंच मोहाचा नाश झाल्याचें लक्षण होय मनुष्याचा सर्व प्रयत्न वरील लक्षण अंगीं बाणण्याकडे असावा परंतु होते काय कीं, वर सांगितलेला मोह नाहींद्रियाच्या द्वारें मनाचें आकलन करून मनाची व बुद्धीची फारकत करतो, आणि त्यामुळे प्रेय आणि श्रेय यांत भेद उत्पन्न होतो

अशी ही मनाची व बुद्धीची फारकत कां व्हावी? श्रेय आणि प्रेय यांत भेद कां उत्पन्न व्हावा? नव्हे हा मोहच कां पडावा? याचें उत्तर हेंच कीं, आपलें अज्ञान परंतु अज्ञान म्हणजे तरी काय? अज्ञान म्हणजे इंद्रियांच्या स्वाधीन होणें इंद्रियांच्या आवडीप्रमाणें मन वावरूं लागणें, मोकाट फिरूं लागणें व त्या सैरावैरा फिरणाऱ्या मनाच्या

---

* दुर्लभ हे सुबुद्ध । त्या परमात्मा चि असाध । ज्ञानेश्वर

सत्याप्रमाणें मनुष्याची वृति व्हावयास लागली म्हणजे तो मोहग्रस्त होऊं लागला असें खुशाल समजावें.

> येथ नेणावयां हें चि कारण । जें इंद्रियां अधीनपण ।
> तिहिं आकलिजे अंतष्करण । म्हणौनि भ्रमें ॥ २×१११

या भ्रमलेल्या मनुष्यास—

> हा रातिदिवसु पाहिं । जैसा जात्यंधा ठाउवा नाहिं ।
> तैसें संदीया सत्य कांहीं । मना नै ये ॥ ४×२००

त्रिकालाबाधित जें सत्य त्याची, (जशी जन्मांधास रात्रिदिवसाची) प्रतीति होत नाहीं, त्याप्रमाणे इंद्रियांच्या अधीन झाल्यानें त्यांचेंच "म्हणितलें" केल्यानें म्हणजे त्यांच्या लालग्यानें हा मोह अथवा संशय उत्पन्न होतो, व तो उत्पन्न झाला कीं लागलीच वर दर्शविल्याप्रमाणे मन-बुद्धीची पारकत होते. असें झालें म्हणजे कर्तव्य कोणतें व अकर्तव्य कोणतें, काय करावें आणि काय न करावें, काय केलें असतां तें त्रिकालाबाधित सत्य प्राप्त होईल, व काय न केलें तर तें दूर पळेल, यासंबंधीच त्या "संदीया" चें तारतम्यज्ञान नष्ट होऊन, इंद्रियांस आवडेल तें आणि त्यामुळें मनास भावेल तें व म्हणून भ्रष्ट झालेल्या बुद्धीस पटेल तें कर्म करण्यास तो उद्युक्त होतो. याप्रमाणें इंद्रियांस प्रिय वाटणाऱ्या कर्मांची कास ज्यानें धरली त्यास मागें एकदा सांगितल्याप्रमाणें पारलौकिक—आत्यंतिक—सुख तर मिळतच नाहीं; पण ऐहिक—तात्कालिक—सुखाचाहि लाभ होत नाहीं.

> संसारबंधु जाए । हें किर तेयाचें कें आहे ।
> परि तो इहिकीं न लाहे । विषय भोगूं ॥ १६×४४६
> तैसें विषयांचेनि कोडें । जेणें परवा केलें उवडें ।
> तेंच सो चि आनि कडे । मरणीं नेला ॥ १६×४४९
> एव परत्र ना स्वर्गु । इहिक ना विषयभोगु ।
> तथ केउता प्रसगु । मोक्षाचा तो ॥ १६×४५०

बरोबरच आहे; ज्याला ऐहिक धडपणें साधतां येत नाहीं त्यास पारलौकिक कोठचें आणि मग प्रामव्य जो मोक्ष तो स्वप्नात तरी मिळावा कसा ?

मुळीं कुंठित करणें म्हणजे ही सर्व अनर्थपरंपरा नाहींशी होईल व आत्यंतिक सुखाचाहि लाभ होईल असें जर कदाचित् कोणास वाटेल तर ती त्याची चूक होईल. कारण, जोंपर्यंत सजीवता आहे तोंपर्यंत इंद्रियांची प्रवृत्ति समूळ कुंठित करणें शक्यच नाहीं. प्रवृत्ति समूळ कुंठित करणें म्हणजे शरीरास अक्रिय करणें होय, ही अक्रिय स्थिति मरणानंतर मात्र देहास शक्य आहे, यर्गी नाहीं. (मरणानंतरहि अशी अक्रिय स्थिति समर्थनीय आहे कीं नाहीं हा मुद्दा एक प्रश्नच आहे कारण, जिवंतपणीं घडणाऱ्या क्रियेच मातंय मरणानंतर संस्काररूपानें असू शकेल).

> तरि स्वभाव काइ निमाले । इंद्रियांचे ? ॥ ३४५४
> सांघे श्रवणें थाइकों ठेलें ? । किं नेत्राचें तेज गेलें ? ।
> हें नासारंध्र बुजालें । परिमळु नेघे ? ३४२५
> कां प्राणापानगति । खलन जाले इयें मती ? ।
> किं क्षुधातृषादि आर्ती । खुंटलिया ? ॥ ३४५६
> हे स्वमानबोध ठेले । किं चरण चालों विसरले ।
> हें असो काइ निमालें । जन्ममृत्यू ? ॥ ३४५७
> हे न टके चि जरि पाइ । तरि सांडिलें पथ काई ।
> म्हणौनि कर्मासि त्यागु नाहीं । प्रकृतिमतां ॥ ३४५८

म्हणून इंद्रिय हीं स्वतःच्या सुखदुःखानुरोधानं विषयाकडे धाव घेणारच, आणि त्यांनीं विषयाकडे धाव घेतली म्हणजे मनुष्यास त्यापासून सुखदुःख होणारच, मग यास

उपाय काय ?

कारण, त्यावाचून मनुष्यास शांति कशी मिळावी ! ज्याला शांति मिळत नाहीं त्याला आत्यन्तिक सुखहि मिळत नाहीं

> देखें अग्निमाजि घापाति । तियें बीजें जरि विरुढती ।
> तरि अशांता सुखप्राप्ति । घडों शके ॥ २४३४६

जळालेल्या बीजास जसा अंकुर फुटावयाचा नाहीं तसा अशान्तास सुख नाहीं. इंद्रिय तर अक्रिय करितां येत नाहींत, वरं त्यांची स्वैरप्रवृत्ति झाली

तर मोह उत्पन्न होतो, अशा अडचणींतून निभावून नेणारा एकच उपाय आहे

पाण्याचा लोंढा–झोत एकदम अडवू म्हटला तर तो अडविला जात नाहीं, व अडविला तर त्याच्या सैरावैरा वहाण्यानं आजूबाजूच्यांना नाश होतो, म्हणून जे बुद्धिमान् आहेत ते त्याला विशिष्ट मार्गाला वळवून त्याच्या जोराचा व सत्त्वाचा उपयोग करून घेतात त्याप्रमाणे इंद्रियें हीं प्रवृत्तिशील असल्यामुळे त्यांची धाव एकाद्या विशिष्ट मार्गानं नेऊन त्याचेवरून जे धीमान् आहेत ते मोक्ष प्राप्त करून घेतात आता असला हा अत्यंतोपयोगी व नाशापासून बचावून प्राप्त मिळवून देणारा उपाय कोणता म्हणाल तर

वेदप्रामाण्य

हा होय, म्हणजे स्वैर ज्या मनाची प्रवृत्ति बाजूला सारून ( कर्तव्य ) कर्म कोणते, अकर्म कोणते व विकर्म कोणते हे शास्त्रदृष्ट्या ठरवून, कर्तव्याकडे इंद्रियांची प्रवृत्ति करणें. यासच 'कर्मयोग' म्हटलेले आहे, व यासच 'निःश्रेयसमार्ग' हि म्हटलेले आहे. त्यास म्हणून आपले अंतिम कल्याण करून घ्यावयाचे असेल त्यानं प्रथम या कर्ममार्गाचे अवलंबन केले पाहिजे, त्याचा अंतिम कल्याणाचा आत्मा या कर्ममार्गानच गिरविला गेला पाहिजे

> याकारणें प वापा । जेया आपुली आथि कृपा ।
> तेणें वदांचिया निरोपा । आन न कीजे ॥ १६×४४२

ग्नन केलें पाहिजे आपल्या मनावृत्तीच्या दृष्टींनी हे स्वकर्म सुसंगत असेल तर त्याचा स्वीकार करावयाचा, नसेल तर त्याचा त्याग करावयाचा, यास वेदाज्ञापालन अथवा स्वकर्माचरण म्हणत नाहींत. तें स्वकर्माचरण आपल्या आवडीनिवडीवर ठवणें म्हणजे आपण प्रत्यक्ष इंद्रियांच्या तावडींत जाण्यासारखेंच आहे, अथवा मोहानें अभिनिविष्ट होण्यासारखें आहे, आपला मुख्य उद्देश तर इंद्रियांचा स्वैराचार मोडून मोहाचा नाश करणें हा आहे, असें असतां स्वकर्म इंद्रियांच्याच प्रवृत्तिनिवृत्तीवर--आवडीनिवडीवर--अवलंबून ठेवणें म्हणजे आसन्नमरणास अमृत म्हणून विष पाजण्यासारखेंच आहे. सकृद्दर्शनी स्वकर्म करणें अनुभवास अत्यंत दुष्कर असें भासेल, परंतु तेंच करणें व इंद्रियांकडून करविणें हेंच युक्त व इष्ट आहे

**शास्त्र म्हणील सांडावें। तें राज्य ही तृण मानावें॥**
**जें घेववि तें न मनावें। विष ही थोरू॥ १६x४०१७**

सर्व ऐहिक लाभांत श्रेष्ठ लाभ हा राज्यलाभ होय तसेंच इहलोकीं मोठी हानि म्हणजे मृत्यु ही होय मृत्यूहून अधिक मोठी हानि या लोकीं दुसरी नाहीं असें असताहि वेदाज्ञा पाळण्यांत म्हणजे स्वकर्म करण्यांत या दोहोंचा जरी विपर्यास होऊं लागला तरी ती पाळलीच पाहिजे

हें स्वकर्म करीत असतां, हें स्वधर्माचरण हातानें घडत असतां पहिल्याप्रथम "इंद्रियांचा मार्ग मोडला जाणें" हें अवश्यक आहे. इंद्रियांस अप्रिय अशा वस्तूचा अगर कृत्याचा अथवा स्थितीचा हें धर्माचरण करीत असतां आदर करावा लागेल उलटपक्षीं प्रिय अशा वस्तूचा अगर कृत्याचा अथवा स्थितीचा किंवा व्यक्तीचा त्याग करावा लागेल, पण तो करणें भाग आहे एवढेंच नव्हे, तर तो अंतःकरणापासून करणें भाग आहे कारण, अशा प्रसंगीं जो त्याग अथवा जें ग्रहण करावयाचें तें जर बाह्यतः इंद्रियांनींच असेल व मनानें त्याचें उलट चिंतन होत असेल, तर तें स्वधर्माचरणास विरुद्ध होय असल्या कृत्याची जमा स्वधर्माचरणांत होत नाहीं इंद्रियांना हट्टानें आवरून धरून त्यांच्या विषयांचें चिंतन मनांतून अहर्निश करणाऱ्याला 'मिथ्याचारी' म्हणतात. हा मिथ्याचारी मनुष्य विषयासक्तींतून केव्हांहि पार पडत नाहीं

जरि हृदईं विषयस्मृति । तरि नि संगा ही आपजे संगति ।
विषयांचें ध्यान । जरि विषायें वाहे मन ॥ २×३२९
तरि एसणें हें पतन । गिरसीत पावें ॥ २×३३०

म्हणून—

विषय आघवे । सर्वथा मनोनि सांडावे ।
मग रागद्वेष स्वभावें । नाशतील ॥ २×३३१

विषयचिंतनाने काम—वासना—उत्पन्न होतो, अतृत वासनेपासून क्रोध येता, त्या क्रोधाच्या योगानें मूढता येते, मूढतेनें स्मृतिभ्रंश होऊन बुद्धिनाश होतो व बुद्धिनाश झाला की मनुष्याचें पतन होतें. ही अनर्थपरंपरा एका मिथ्याचारा पासून म्हणजे विषयासक्तीपासून उत्पन्न होते. एवढ्याकरिता ज्यास आपलें पतन टाळावयाचें असेल त्यानें आपले स्वकर्माचरण इंद्रियदमनपूर्वक व मनापासून करावें.

स्वकर्म हाच स्वधर्म

होय. या स्वधर्मास निजधर्म—स्वकर्म—विहित कर्म—निजवृत्ति—स्वमार्ग असे पर्याय श्रीज्ञानेश्वरींत दिलेले आहेत.

तऱ्हीं स्वधर्मु एकु आहे । तो सर्वथा त्यजु नव्हे ॥ २×१८२
आपुला निजधर्मु तूं पाहिं ॥ २×१८६
तुज उचित होये आतां । स्वकर्म हें ॥ २×२६४
तरि दोषु न घडे स्वभावें ॥ २×२२९
न संडिजे तुवां आपुलें । विहित कर्म २×२६५
निजवृत्ति जेथ सांडे । तेथ स्वतंत्रतें यास्ति न घडे ॥ ३×१११

हें स्वकर्मा—स्वधर्मा—चरण करीत असता समविषमतेचा, योग्यायोग्यतेचा किंवा इष्टानिष्टतेचा असा कोणताहि विचार मनात आणू नये. शास्त्रप्रमाणें (वर्णाश्रमाप्रमाणें) जें कर्म आपण करतो तें आपल्यास म्हणजे आपल्या इंद्रियास प्रिय आहे का अप्रिय आहे, त्यापासून सुखोत्पत्ति आहे का दुःखोत्पत्ति आहे, तें पुण्यात्मक आहे का पापात्मक आहे, आणि आपल्या हातून तें अशेष पार पडेल की नाहीं यापैकीं कोणताहि विचार कार्यकारी मनुष्यानें स्वकर्म करितांना आपल्या मनात आणू नये.

जें सुखालागि आपणपेयां । निंब चि धर्मज्या ।
तें कडुवटपण तेया । मोगिजे ना ॥ १८x९२०
स्वधर्मु सांकडु । देखोनि केला जरि फोडु ।
तरि मोक्षसुखाडु । अंतरला ॥ १८x९२२
पया स्वधर्मातें अनुष्ठितां । जरि वेचु होईल जीविताचा
तो हीं नीका घर उभयता । दिसतसे ॥ ३x२२४
वाया चि व्याकुल काइ । आपुला निजधर्मु तूं पाहीं ।
जो आचरितां बाधु नाहीं । कव्हणा काळीं ॥ २x१८६
सुखि संतोषा नैयावें । दुःखि विषादा न भजावें ।
आणि लाभालाभ न धरावे । मनामाझि ॥ २x२२६
आचरतां सिद्धी गेलें । तरि काजा चि कीर आलें ।
परि ठेलेया हीं सगुण जालें । ऐसें चि मानीं ॥ २x२७०

यर्थ एक गोष्ट प्रथम सागून ठेविली पाहिजे. ती ही कीं, स्वधर्म किंवा स्वकर्म म्हणजे आपापल्या वर्णाश्रमाप्रमाणें विहित अशी मानसिक किंवा शारीरिक क्रिया, आणि परधर्म म्हणजे वर्ण किंवा आश्रम यास अविहित जी क्रिया ती. ब्राह्मणास आपल्याळीं शस्त्रग्रहण हा स्वधर्म होय. तसेंच क्षत्रियास सामान्यकाळीं भिक्षा मागणे हा परधर्म होय. धर्मस्थापनेसाठीं ईश्वराचा जो अवतार होतो, तो चातुर्वर्ण्यव्यवस्था बिघडली असल्यास तिची पुन्हा स्थापना करण्यास होतो व 'धर्म' शब्दाचा हाच अर्थ आहे. असो.

आयुष्यात कित्येक प्रसंग असे येतात कीं, त्या वळीं स्वधर्माचरणापेक्षा परधर्मस्वीकार हा अत्यंत सुखदायक व हितपरिणामी असा भासतो. अशा वेळीं मन हें चंचल होऊं न देतां, परधर्माचरण हें नेहमींच दुःखपर्यवसायी व अविहित म्हणजे निषिद्ध म्हणून दोषास्पद आहे अशी मनाशीं गाठ बांधावी. उदाहरण अर्जुनाचेंच घेऊ. युद्धास उभा राहिला असता त्यास मोह झाला तो असा:—

या युद्धात एक तर माझा जय होईल अगर अपजय होईल, जय व्हावयाचा असल्यास प्रतिपक्षायाच्या वधावाचून तो होणें नाहीं, त्याचा वध म्हणजे गोत्रबंधूचा वध असल्यामुळे तो अत्यंत तापदायक व गुन्हल्येचें

जरि हृदईं विषयस्मृति । तरि नि संगा ही आपजे सगति ।
विषयांचें ध्यान । जरि विषायँ वाहे मन ॥ २×३२१
तरि एसणें हें पतन । गिवसीत पावें ॥ २×३३०

म्हणून—

विषय मायवे । सर्वथा मनींनि सांडावे ।
मग रागद्वेष स्वभावें । नाशातील ॥ २×३३१

विषयचिंतनानें काम—वासना—उत्पन्न होतो, अतृप्त वासनेपासून क्रोध येतो, त्या क्रोधाच्या योगानें मूढता येते, मूढतेनें स्मृतिभ्रंश होऊन बुद्धिनाश होतो व बुद्धिनाश झाला कीं मनुष्याचें पतन होतें. ही अनर्थपरंपरा एका मिथ्याचारा पासून म्हणजे विषयासक्तीपासून उत्पन्न होते. एवढ्याकरिता ज्यास आपले पतन टाळावयाचें असेल त्यानें आपलें स्वकर्माचरण इंद्रियदमनपूर्वक व मनापासून करावें.

*स्वकर्म हाच स्वधर्म*

होय. या स्वधर्मास निजधर्म—स्वकर्म—विहित कर्म—निजवृत्ति—स्वमार्ग असे पर्याय श्रीज्ञानेश्वरींत दिलेले आहेत.

तऱ्हीं स्वधर्मु एकु आहे । तो सर्वथा त्यजु नव्हे ॥ २×१८२
आपुला निजधर्मु तू पांहिं ॥ २×१८६
तुज उचित होये आतां । स्वकर्म हें ॥ २×२६४
तरि दोषु न घडे स्वभावें ॥ २×२२९
न संडिजे तुवां आपुलें । विहित कर्म २×२६५
निजवृत्ति जेथ सांडे । तेथ स्वतंत्रते वास्ति न घडे ॥ ३×१११

हें स्वकर्मा—स्वधर्मा—चरण करीत असतां समविषमतेचा, योग्यायोग्यतेचा किंवा इष्टानिष्टतेचा असा कोणताहि विचार मनांत आणू नये शास्त्रांप्रमाणें (वर्णाश्रमाप्रमाणें) जें कर्म आपण करतों तें आपल्यास म्हणजे आपल्या इंद्रियास प्रिय आहे का अप्रिय आहे, त्यापासून सुखोत्पत्ति आहे का दुःखोत्पत्ति आहे, तें पुण्यात्मक आहे का पापात्मक आहे, आणि आपल्या हातून तें अशेष पार पडेल कीं नाहीं यापैकीं कोणताहि विचार कार्यकारी मनुष्यानें स्वकर्म करितांना आपल्या मनांत आणू नये.

पातक लागणारा असा आहे व त्यामुळें पुढें वर्णसंकरहि होण्याचा संभव आहे. असला हा ज्ञातीचा उच्छेद करणारा, वर्णसंकर घडवून आणणारा व गुरुद्रोहासारख्या पातकानें स्वतःस नरकीं पचविणारा जय त्याज्य आहे, म्हणून हें युद्ध दुःखारंभी व दुःखपर्यवसायी आहे. उलटपक्षीं अपयश आलें तर अपकीर्ति होईल व मरण येईल, अपकीर्तीपेक्षा मरण बरें. मरण आल्यास पुरुषार्थाचें साधन जो देह तो नाहींसा होईल व असें झालें म्हणजे संसारभयाचा नाश म्हणजेच जीवितसाफल्य होणार नाहीं. तेव्हां कोण त्याहि दृष्टीनें जरी पाहिलें तरी युद्ध हें अहितपरिणामीच ठरत आहे, म्हणून त्याचा त्याग करणें हेंच श्रेयस्कर आहे असें मला वाटतें. युद्धापेक्षा "भिक्षा मागता भली" याप्रमाणें अर्जुनाची विचारसरणी आहे.

मोहाचा धर्मच असा आहे कीं, तो अगदीं हुबेहूब विचाराचें रूप धरतो, परंतु त्याचे मुळाशीं मनाची दुर्बलता व अधर्म असावयाचा, त्याप्रमाणें अर्जुनाची ही विचारसरणी दिसण्यांत प्रथमतः फार गोड दिसते, परंतु थोडा विचार केला असतां त्यानें येथें तीन प्रमाद केलेले आहेत असें दिसून येईल. पहिला—स्वधर्माचरण करीत असतां कोणताहि दोष अंगास येत नाहीं, हें धर्माचरणाचें जें मुख्य तत्त्व तें तो विसरला. दुसरा—धर्माचरण करीत असतां त्यांत सुखदुःखें अथवा यशापयश यांची आधींच उठाठेव करीत बसला, आणि तिसरा—सर्वांत मोठा हा कीं, स्वधर्माचरण दुष्कर म्हणून व परधर्म सुकर म्हणून भुलून जाऊन पतनशील परधर्म जी भिक्षा ती स्वीकारण्याचें त्यानें योजिलें.

> परु आचारु जो परावा । तो देखतां किर बरवा ।
> परि आचरतेनि आचरावा । आपुला चि ॥ ३×२१५
> म्हणोनि आणिकांसि जें विहित । आणिक आपणेया अनुचित ।
> तें नाचरावें जरि हित । विचारिजे ॥ ३×२२३
> आणि स्वधर्मु चि पाळावा । परधर्मु तो गाळावा ।
> हा नियमु हीं पांडवा । न कीजे चि पां १८×९३०
> परा पराचारा वरिविया । ऐसें होईल टेंकलेयां ।
> पायांचें चालणें डोया । कैलें जैसें ॥ १८×९२८

निजधर्मु आचरितां बाधु नाहीं । कव्हणा काळीं ॥
सुखि संतोषा नैयावें । दुःखि विषादा न भजावें ।
आणि लाभालाभ न धरावें । मनामाझि २×२२६
एथ विजयपण होईल । कां सर्वथा देह जाईल ।
हें आदि चि कांहिं पुढैल । चिंतावें ना ॥ २×२२७

तेव्हा स्वकर्माचरण अथवा स्वधर्माचरण कितीहि कठिण असले आणि परधर्माचरण तितकच दिसण्यात सुकर व सुखानुभवी असल तरी त्याचा त्याग करून स्वधर्माचरणच केल पाहिजे.

हे स्वकर्माचरण दोन प्रकारचे आहे. एक सकाम व दुसर निष्काम. कर्तृत्वाच्या सक्स्थान व स्वर्गादिसुखाच्या भोगेच्छेन केलेलें शास्त्रविहित कर्म हाहि स्वधर्मच होय, परतु हा स्वधर्म निष्कामतेनें आचरिलेल्या स्वधर्माहून कमी योग्यतेचा आहे. कारण, असे पहा की, स्वर्गादिसुखे काय अगर एहिक सुख काय, हीं इद्रियांच्या विषयोन्मुखतेनच उत्पन्न होतात, परतु इद्रियांच्या या स्वभावासरशी तर आपल्याला सावधगिरी ठेवावयाची आहे व तस आपण पूर्वी निश्चितहि केलेलें आहे, तर मग होत काय की, शास्त्रनियमाप्रमाण स्वकमाचरण करूनहि सकामाचरणानें इद्रियांचेच कोड पुरविले जाते. अत्यन्त कष्ट सोसून सकामतेनें कर्म करणे म्हणजे उत्तम पक्वान्ने तयार करून त्यात विष कालविण्यासारखेच आहे शास्त्रोक्ताचरणाचा जो मुख्य हेतु तो सकाम आचरणानें नाश पावतो, म्हणज सकाम अशा स्वधर्माचरणात हेतुविघाताचा दोष उत्पन्न होतो.

क्रियाविशेषें बहुतें । न लोपीति विधितें ।
निपुण होउनि धर्मातें । अनुष्ठिति ॥ २×२४९
परि एक चि कूड करीति । जे स्वर्गकामु मनीं धरिति ।
यज्ञपुरुष चूकति । भोक्ता जो ॥ २×२५०
( तैसा ) नाशीति धर्मु निफनला । हेतुकपणें ॥ २×२५२
सायासें पुण्य आर्जिजे । मग ससारु कां अपेक्षिजे ।
परि नेणते ते काइ कीजे । अप्राप्त देखें ॥ २×२५३

असल्या या सकाम आचरणात इद्रियांच्या आवडीनिवडीवर विसबून न रहाता

शास्त्रदृष्टीने स्वधर्म चोखत त तेव्हाच पारगता येऊन एक मोठीच अड चण दूर होत गरा परंतु तवढ्यान मनुष्यास इष्ट जो आत्यन्तिक सुखाचा लाभ तो मात्र मिळत नाहीं कारण, काम्य कर्मे शास्त्रान विहित आहेत व तीं वेळीं असता आणि सुदैवानें तीं सफल झालीं असता, मनुष्यास त्या त्या कर्मांचा परिणाम न स्वर्गादिभोग ते मिळतात हें खरें परंतु या परिणामाचा सूक्ष्म विचार केला असता असं आढळून यईल कीं, शास्त्राज्ञा पालन करूनहि यात इंद्रियाधीनता नष्ट होत नाहीं, म्हणन काम्य कर्मांचे बाबतींत शास्त्राज्ञचे पालन होऊनहि इंद्रियदमन साधत नाहीं, जथें इंद्रियदमन नाहीं तथ वर वर्णन करण्यात आलेली कामक्रोधादि अनर्थपरंपरा कायम असते, व या अनर्थपरंपरेचा परिणाम नाश (वध) हाहि अर्थातच कायम असता तेव्हा शास्त्रोक्त कर्मांच सकाम आचरण *हें कांहीं वास्तविक स्वधर्माचरण किंवा स्वकर्माचरण नव्ह*

वेद हे त्रिगुणात्मक असल्यानें खरें स्वकर्माचरण अथवा स्वधर्माचरण याच्या पायरीस न पोचणारें असें जें काम्य कर्म, तें वेदविहित असूनहि टाळाव, असा श्रीज्ञानेश्वरांची शिकवण आहे म्हणजे विहित कर्म टाकून द्यावें असं नाहीं, तर तें आचरीत असता वेदविहित जी सकामता ती टाळावयाची

> म्हणौनि तूं हें जाण । हें सुखदुःखासी चि कारण ।
> एथ ज्ञानें अंतष्करण । रिगों नेदिं ॥२×२५८

आयासच जर करावयाच, तर ते काम्य कर्मांच्या एवजीं स्वकर्म अथवा स्वधर्म यांच्या निष्काम आचारात केले तर काय बिघडत ? " आड रानीं रिगाल्यानें " पाय शिणतात आणि सरळ मार्गानें गेल तरी पाय शिण तातच, याप्रमाण दोन्हीं मार्गानें जाण्यामध्य जर आयास आहेत, तर सरळच मार्गानें का जाऊ नये व मुक्कामास पोहोचू नये ? रणात अभिमुख राहिलें असतांहि मरण येणार व पळाल तरी पाठीवरील घावानें मरण येणारच, असें जेथें स्थिति आहे तेथें शत्रूस मारत मारत समोरील वार सहन करून रणांत तरी कां जाऊ नये ?

अगा उजू वाटा चालावें । तऱ्ही पायें चि सीणवावें ।
ना आडरानें धावावें । तऱ्ही तें चि ॥ १८×९३३

आगा पाठीं लागतां धाई । मरण न चुके चि पाहीं ।
तरि समोरिलां काई । आगलें कीजे ॥ १८×९३८

म्हणून काम्य कर्म करण्यात जे आयास करावयाचे तेच निष्काम कर्म कर ण्यात वेच तर काय बिघडलं? काम्य कर्म करण्यातहि मनादि इंद्रियास एक प्रकारचा आळा घालण्याची सवय होत, तीच निष्काम कर्म करण्यात हवत करण फारस जड जावयाच नाही. काम्य कर्म आचरण्यात वर दिलेल्या विपरीत परिणामाखेरीज आणखीहि एक दुष्परिणाम संभवता ता असा —

काम्य कर्म अगदी समाप्तीचे वेळींहि अविहित झाल तर केलेले श्रम सर्व फुकट जातात, निष्काम कर्माचे याच्या अगदीं उलट आहे कितीहि थोड्या प्रमाणात अमृत घेतल तरी जसे तें आयुष्यदायी होत तसं निष्काम केलेल स्वधर्माचरण वायगाम न जाता ते अल्प जरी घडल तरी संसार भयापासून मुक्त करते.

अर्जुना! जें पुण्यवशें । जरि अल्प चि हृदईं प्रकाशे ।
तरि अशेष हें नाशे । संसारभय ॥ २×२३७

सकाम कर्मात रागद्वेषादि विकार असल्याने तेथ सुखदु खाचा संभव आहे ह वर सांगितलेच आहे, निष्काम कर्मात कर्तेपणाच्या अहंकार नसल्याने व फलाशाहि पण नसल्याने राग, द्वेष व तद्भूत सुखदु ख याचा अभाव असणे अर्थातच साहजिक आहे

नैष्कर्म्यच अंगीं बाणावयाचे आहे, ते अकर्मानं होईल का नाही? म्हणून कर्तेपणाची अनहंकृति, फलाशेचा त्याग आणि इंद्रियाचे दमन एवढा खटाटोप करून जें नैष्कर्म्य साधावयाचे ते सरळ त्याचाच पर्याय, काहींच कर्म न केल्याने साधल का नाही अशी प्रश्न कोणी करील तर त्यास उत्तर हेच की, विहित कर्म सोडून नैष्कर्म्याची प्राप्ति कधीच होत नाही.

जें उचित कर्म सांडिति । मग नैष्कर्म्य हों पाहांति ।
परि कर्मेंद्रियप्रवृत्ति । निरुंधुनि ॥ ३×६४

तेयां कर्मत्यागु न घडे । जें कर्तव्य मनीं मांघडे ।
वरि नटति ते कुडे । दरिद्र जाण ॥ ३×६५

कां प्राप्तकर्म सांडिजे । पतुलेनि नैष्कर्म्या होइजे ।
हें अर्जुना! वायां चि बोलिजे । मूर्खपणें ॥ ३×४६

म्हणौनि आइकें पार्था । जेया नेष्कर्म्यपदीं आस्था ।
तेयां उचित कर्म सर्वथा । त्याज्य नोहे ॥ ३×५०

विहित कर्मांचा त्याग करून नैष्कर्म्य प्राप्त होत नाहीं इतकेंच नाहीं, तर वर दर्शविल्याप्रमाणे देह आहे तावत्कालपर्यंत कोणत्याच कर्मांचा त्याग होणें शक्य नाहीं.

हां गा सव्यसाची । मूर्ति होउनि देहाची ।
खति करीति कर्मांची । गावढीं नां ॥ १८×२१६

शरीराचेनि आभासें । नांदतु जव असे ।
तव कर्मत्यागाचें पीसें । काइसें तन्हीं ॥ १८×२२०

आणि निषिद्ध तर आचरणें नाहीं! तेव्हां कर्मावांचून नैष्कर्म्य संभवत नाहीं हें स्पष्ट आहे. असलें हें नैष्कर्म्य अंगीं बाणण्यास कांहीं निराळें साधन नको. स्वकर्मानें सर्वात्मक ईश्वराची सेवा करीं कीं झालें, स्वकर्म हेंच परमात्म्याचें पूजन आहे, आणि या पूजनानें परमेश्वर संतुष्ट होऊन पूजकास वैराग्य हें प्रसादान देतो. वैराग्यानंतर ज्ञान होतें, आणि चिर काल शांति हा त्या ज्ञानाचा परिपाक या अभंदीं भक्तास लाभतो.

तियें परौतें कांहिं । निफजणें पथ नाहिं ।
म्हणौनि म्हणिपे पाहीं । परमसिद्धि ते ॥ १८×९७७

ही शांति उत्पन्न करणारें जें ज्ञान त्यासच नैष्कर्म्य म्हटलें आहे व ही परमसिद्धि होय, आणि यालाच कर्मसाम्यहि म्हणतात. जो नैष्कर्म्य तोच सन्यासी, तोच योगी, भक्तहि तोच आणि त्याचेंच नाव ज्ञानी, हें दाखविण्याकरिता नैष्कर्म्याची क्रमपरंपरा दिलेली आहे ती अशीः—

म्हणौनि यावेया शांति । हा चि क्रमू गा सुभद्रापति ! ।
अभ्यासु चि प्रस्तुति । कारण येथ ॥ १२×१३९
अभ्यासाहून गहन । पार्था ! मग ज्ञान ।
ज्ञानापासुनि ध्यान । विशेषिजे १२×१४०
मग कर्मफलत्यागु । तो ध्यानापासौनि चांगु ।
त्यागातव भोगु । शांतिसुखाचा ॥१२×१४१

येथें अभ्यास म्हणजे हठयोग, ज्ञान म्हणजे शब्द व युक्ति याच्या द्वारें आत्म्याबद्दलचा जो निश्चय तो, ध्यान म्हणजे मनाचें बुद्धीशीं दृढीकरण आणि नंतर कर्मफलत्याग. वस्तुतः कर्मफलत्यागाच्या या पायऱ्याच नव्हत, तर कर्मार्पण ज्या परमात्म्याकरिता करावयाचें त्याच्या स्वरूपाचा निश्चय व अनुभव या अभ्यासादि साधनद्वारा सारखाच होत असल्याने हे त्याच पर्याय आहेत. असला स्वरूपनिश्चय जो ज्ञानध्यानानीं होतो तोच भक्तांना होतो व तोच योगानेंहि होतो. अशा भक्तास ज्ञानीवर्गांत म्हटल आहे

ऐसेनि गा समरसें । दृष्टि जें उल्हासें ।
ते पे भक्ति ऐसें । आम्हि म्हणों ॥ १४×३८४
आणि ज्ञानाचें चांगावें । इयें चि दृष्टी नावें ।
योगाचें हि आघवें । सर्वस्व हें ॥ १४×३८५
पार्था गा जगीं । मकु तो चि योगी ॥ १२×२३१

तेव्हा वर दर्शविल्याप्रमाणे जो भक्त तोच योगी, जो भक्त तोच ज्ञानी, त्यालाच समदृष्टि व त्यालाच नैष्कर्म्यहि म्हटलेले आहे. म्हणून भक्ति अथवा योग अथवा ज्ञान हे वास्तविक पाहिले असता नैष्कर्म्याचेच पर्याय आहेत, कारण नव्हत. तथापि कार्यकारणभावातच आपण येऊं भक्तीने नैष्कर्म्य कसे साधते ते आपण पाहिलेच. तसेच अभ्यासयोगाने कसे साधते ते पाहू. निश्चाच विविधत्व नामरूपात्मक आहे एकाच लाकडाचे निरनिराळे पदार्थ करिता येतात व त्यास निरनिराळी नावे देता येतात. वस्तुतः त्या सर्व वस्तूच मूळरूप लाकूडच असते, तसे या जगात सर्व चैतन्य असून नाम रूपाच्या योगाने विविधत्व भासते आणि हे विविधत्व भासणे हा मनाच्या वृत्तींचा परिणाम आहे, म्हणजे या जगीं ही जी भिन्नता भासते त्या भासाचे कारण थोडा विचार केला तर आपणास असे दिसून येईल की, मन हेच होय जसजशा भिन्न वृत्ति मनावर उठतात तसतसा जगात भिन्नतेचा भास होतो, म्हणजे मन हाच जणों एक पडदा असून त्यावर

जेथ हे संसारचित्र उमटे । तो मनोरूपु पट फाटे ॥
जैसा सरोवरू आटे । मग प्रतिमा नाहीं ॥ ५x१५५
तैसें नामरूप तेयाचें । यन्हवि ब्रह्म चि ब्रह्मिचें ।
मन साम्या आलें जेयाचें । सर्वत्र गा ॥ ५x१००

अशा तऱ्हेनें जेथें मनच गेलं म्हणजे जेथें वृत्ति शून्याकार झाली तेथें अहंकार समूळ नाहसा होण साहजिकच आहे, आणि वर सांगितल्याप्रमाणें भेद नाहींसा झाल्यामुळें जगात एकच वस्तु स्फुरण पावणं हेहि सहज आहे.

तैसें मनपण मुदल जायें । मग अहभावादिक कें आहे ।
म्हणौनि शरीरें चि गगन होये । अनुभवीं तो ॥ ५x१५६
वासनांतरांची विवचना । मग आपैसीं पाउंचे अर्जुना ।
जेव्हलि गगनीं लो मना । पवनें कीजे ॥ ५x१५४

मनपवन एक होऊन त्याचा गगनात लय झाला म्हणजे

भोगांतुनि निघतां । चित्त मजमाजी रिगतां ।
ढळु ढळु पांडुसुता । मी च होसी ॥ ५x१७६

असा मनाचा लय होण्यापूर्वी एका गोष्टीबद्दल सावधगिरी ठेवणें अवश्य आहे, अवश्य आहे असें म्हणण्याच्या एवजीं सावधगिरी आपोआपच राहते असं म्हटले तरी चालल, ती ही कीं, जगात जो भेद दिसतो तो मनाच्या वृत्तीमुळं तर खराच, परतु त्या वृत्तीस बुद्धीचीहि जोड मिळत असते म्हणून, यासाठीं योग्यानं मनाबरोबरच बुद्धीचाहि विराम केला पाहिजे. मन आणि बुद्धि हीं एकाच चैतन्यात आराम पावलीं म्हणजे मनाचें आणि बुद्धीचें समत्व झालं कीं, योगाची पराकाष्ठा झाली असें समजावें.

तरि मन हें येक । माझां स्वरूपीं वृत्तिक ।
करूनि घालीं आणिक । बुद्धी हीं ॥ १२x९१
समत्व चित्ताचें । तें चि सार जाण योगाचें ।
जेथ मन आणि बुद्धिचें । ऐक्य आथि ॥ २x२७३

मन आणि बुद्धीचें ऐक्य होऊन विश्वाचं विविधत्व नाहींसं झालें कीं, आत्मतत्त्व हाच एक विषय बुद्धीला राहतो, ( विषयविषयी हा संबंध

